<u>शासकीय निवासस्थान वाटपाबाबत</u>
**घाटकोपर येथील नविन इमारतीतील निवासस्थानासाठी इच्छुकता.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः शानिवा १०१७/प्र.क्र.६६/१७/२३-अ**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख:- ०७ फेब्रुवारी, २०१७

**परिपत्रक:-**

बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील गट “ब” व गट “क” मधील अधिकारी/ कर्मचा-यांना या विभागाच्या अखत्यारितील वाटप करावयाची निवासस्थाने शासकीय वसाहत, वांद्रे, वरळी, बोरिवली, घाटकोपर (पंतनगर) येथे उपलब्ध आहेत. आता “ नगर भूमापन क्रमांक ब-१९४, पी.डब्ल्यु.डी. ग्राऊंड, चेंबूर-मानखूर्द लिंक रोड,घाटकोपर (पूर्व)” येथे बांधण्यात आलेल्या शासकीय वसाहतीतील नवीन इमारतीमधील निवासस्थानांचे वाटप करावयाचे आहे.

२. दरम्यानच्या कालावधीत गट “ब” व गट “क” च्या अधिकारी/कर्मचा-यांपैकी काही अर्जदारांनी घाटकोपर येथील निवासस्थानांसाठी इच्छुकता दर्शविली आहे तर काही अर्जदारांनी घाटकोपर येथील निवासस्थानांसाठी इच्छुकता दर्शविलेली नाही. ज्या अर्जदारांनी यापूर्वी घाटकोपर येथील निवासस्थानांसाठी इच्छुकता दर्शविलेली नाही त्यांना घाटकोपर येथील शासकीय निवासस्थान हवे असल्यास त्यांनी तशी इच्छुकता दिनांक २० मार्च, २०१७ पर्यंत शासनास ( कार्यासन २३-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२) कळवावी. अशाप्रकारे इच्छुकता कळविणा-या प्रतिक्षायादीतील अर्जदारांचा विचार घाटकोपर येथील शासकीय निवासस्थानांसाठी केला जाईल. इच्छुकता कळवितांना अर्जदारांनी त्यांचे नाव, मोबाईल क्रमांक, ई-मेल व कार्यालयाचा पत्ता नमूद करावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०२०७१५०३२०१२०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Rajesh Sudhakar Wadnerkar

Digitally signed by Rajesh Sudhakar Wadnerkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab64acf9acc2b1c026a9f36d01fcf0fef77d967f2bf49a3b51d07aee2982c881, cn=Rajesh Sudhakar Wadnerkar
Date: 2017.02.07 15:05:31 +05'30'

**(रा.सु.वडनेरकर)**
कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई

२. त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रकातील सूचना आपल्या विभागातील व बृहन्मुंबईतील आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयातील अधिकारी/ कर्मचा-यांच्या निदर्शनास आणाव्यात.

Rajesh Sudhakar Wadnerkar

Digitally signed by Rajesh Sudhakar Wadnerkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab64acf9acc2b1c026a9f36d01fcf0fef77d967f2bf49a3b51d07aee2982c881, cn=Rajesh Sudhakar Wadnerkar
Date: 2017.02.07 15:08:21 +05'30'

**(रा.सु.वडनेरकर)**
कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग